**राज्यातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांना “उत्कृष्ट औद्योगिक प्रशिक्षण संस्था पुरस्कार” देण्याच्या योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः आयटीआय २०१५/प्र.क्र.१४२/व्यशि-३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १० फेब्रुवारी, २०२२

**पहा:** १) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा.,मुंबई यांचे पत्र क्र. २०/ सीटीएस/उत्कृष्ट औ.प्र. संस्था २०१५/३१, दिनांक १९.०१.२०१५
२) शासन निर्णय क्र. आयटीआय-२०१५/प्र.क्र.१४२/व्यशि-३, दि.१७.०२.२०१८

**प्रस्तावना:**

राज्यातील उद्योग क्षेत्रातील विविध कामासाठी लागणाऱ्या कुशल मनुष्यबळाचा पुरवठा करणे आणि त्यासाठी युवकांना रोजगाराभिमुख प्रशिक्षण देऊन सक्षम बनविणे तसेच कौशल्य युक्त प्रशिक्षण देऊन उत्पादन व इतर सेवा क्षेत्रामध्ये स्वयंरोजगार करण्यासाठी सक्षम बनविणे, कामगारांना योजनाबध्द प्रशिक्षण देवून औद्योगिक आस्थापनांचा दर्जा, गुणवत्ता व उत्पादन वाढविणे या उद्दिष्टांसह राज्यात शिल्प कारागीर प्रशिक्षण योजना सुरु आहे. जागतिक बँक अंतर्गत सेंटर ऑफ एक्सलन्स या योजनेंतर्गत तसेच पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप या संकल्पनेतून औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा दर्जावाढाचा उपक्रम यशस्वीरित्या सुरु आहे. या योजनांसोबतच सर्व औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून शिकाऊ उमेदवारी योजना, लोकसेवा केंद्र, मागेल त्याला प्रशिक्षण, आदिवासी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण करणे अशा योजना राबविण्यांत येतात. सदरील योजनांची उत्कृष्ट अंमलबजावणी करणाऱ्या संस्थांची दखल घेऊन त्यांना प्रोत्साहन देणे आणि त्याचा आदर्श घेऊन इतर सर्व संस्थांमध्ये निकोप स्पर्धा करुन उत्कृष्टतेकडे वाटचाल करणे आवश्यक आहे. यासाठी संस्थांना **"उत्कृष्ट औद्योगिक प्रशिक्षण संस्था पुरस्कार"** देण्याचा निर्णय संदर्भिय शासन निर्णय दि.१७.०२.२०१८ अन्वये घेतलेला आहे. त्याप्रमाणे केंद्र पुरस्कृत कौशल्याचार्य पुरस्कारासाठी निवड होणाऱ्या प्रशिक्षकांना सुध्दा प्रत्येकी रु.१.०० लाख याप्रमाणे ५ प्रकारातील पुरस्कारांकरीता रु.५.०० लाख देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. या अनुषंगाने शासन निर्णय दि.१७.०२.२०१८ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत असून शासन शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात येत आहे:-

**शासन शुध्दीपत्रक :**

प्रस्तावनेत नमूद केलेली पार्श्वभूमी विचारात घेऊन राज्यातील शासकीय तसेच खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांसाठी “**उत्कृष्ट औद्योगिक प्रशिक्षण संस्था पुरस्कार**” तसेच केंद्रशासन पुरस्कृत कौशल्याचार्य या पुरस्काराकरीता राज्यातील निवड होणाऱ्या ५ प्रकारातील

प्रशिक्षकांना प्रत्येकी रु.१.०० लाख रोकड पुरस्कार देण्याकरीता शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. सदर योजनेंतर्गत उत्कृष्ट औद्योगिक प्रशिक्षण संस्था पुरस्कारासाठी येणारा रुपये १६.०० लक्ष तसेच मानचिन्ह, प्रशस्तीपत्र पुरस्कार वितरण समारोपाचा खर्च व प्रसिद्धी यासाठी अंदाजे रुपये २.०० लक्ष असा एकूण रुपये १८.०० लक्ष तसेच कौशल्याचार्य पुरस्कार प्राप्त करणाऱ्या ५ प्रकारातील प्रशिक्षणकांना प्रत्येकी रु. १.०० लाख याप्रमाणे एकुण रु. ५.०० लाख इतका खर्च "मागणी क्र :- झेडए-१, २२३०, कामगार व सेवायोजन, ०३, प्रशिक्षण, ००३, कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, ०२, कारागिरांचे तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षण, (०२)(१४) उत्कृष्ट औद्योगिक प्रशिक्षण संस्थांना पुरस्कार (२२३० A३१६)" या लेखाशीर्षाखाली संबंधित आर्थिक वर्षात उपलब्ध होणा-या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र: ११५/१४७१, दिनांक २६.०४.२०१६ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र: २४६/१६/व्यय-५, दिनांक ०७.०५.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०२१०१५१८३५६६०३ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinod Sheshrao Bondre

Digitally signed by Vinod Sheshrao Bondre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4bd97b779f6f1e9e61491311a06aac663b01b00963f2e754c6ee2d5f7c14953d, serialNumber=c313a8b86d67716d182c41d1e22f57d99c8ee5f4654a216d8fe23b5ad24ed271, cn=Vinod Sheshrao Bondre
Date: 2022.02.10 15:20:45 +05'30'

**( विनोद बोंदरे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. मा. मंत्री, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
८. संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, (संचालनालयामार्फत)

१०. उप सचिव (व्यय-५/ अर्थसंकल्प १८), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

११. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (व्यशि-१/ व्यशि-२/ व्यशि-४/ व्यशि-५), कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई

१२. उप सचिव (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)

१५. सर्व संबंधित औद्योगिक प्रशिक्षण संस्था, (संचालनालयामार्फत)

१६. प्रधान सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

१७. निवडनस्ती/ व्यशि-३.